शासकीय विभाग/कार्यालये यांना
लागणा-या वस्तुंच्या खरेदी व
लाकडी फर्निचरबाबत.

GR-20040731163109001-1100

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
पुरक शासन निर्णय, क्रमांक:भांखसं-१०९९/(२८२७)/उद्योग-६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ८ फेब्रुवारी २०००.

वाचा:- शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक:भांखसं-१०८८/(२५१२३)/
उद्योग-६, दिनांक २.१.९२.

**शासन निर्णय:-**

शासकीय विभाग कार्यालये/महामंडळे/मंडळे इत्यादिना लागणा-या वस्तुंच्या खरेदीच्या बाबतीत शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक:भांखसं- १०८८/(२५१२३)/ उद्योग-६, दिनांक २.१.९२ अन्वये धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. सदरहू शासन निर्णयाच्या परिशिष्ट पाच मधील उपभाग (क) मधील अनुक्रमांक १६ येथे दि स्किल्ड ब्लाईंडमेन्स, इंडस्ट्रियल को.ऑप.प्रोडयुसर्स, सोसायटी लि. १६३/५११२, कन्नमवार नगर क्र.१, विक्रोळी (पूर्व ), मुंबई-४०० ०८३. या संस्थेकडून खुर्च्या दुरुस्ती/वेतकाम करुन घेण्यासाठी आरक्षण देण्यात आलेले आहे. आता सदरहू संस्थेस "लाकडी फर्निचर" या बाबीसाठीही या शासन निर्णयाद्वारे आरक्षण देण्यात येत आहे. त्यामुळे दि.२.१.१९९९२ च्या शासन निर्णयातील उपरोक्त परिशिष्ट ५ मधील उपभाग (क) येथील अनुक्रमांक १६येथील नोंद खालीलप्रमाणे वाचण्यात यावी.

| अनुक्रमांक १६ | उत्पादित वस्तु |
|---|---|
| दि स्किल्ड ब्लाईंडमेन्स<br>इंडस्ट्रियल को.ऑप.प्रोडयुसर्स<br>सोसायटी लि.१६३/५११२,<br>कन्नमवार नगर क्र.१. विक्रोळी (पूर्व )<br>मुंबई-४०० ०८३. | खुर्च्या दुरुस्ती/वेतकाम/लाकडी<br>फर्निचर |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ.र.ठक्कर,
कार्यासन अधिकारी

प्रति -

राज्यपाल यांचे सचिव.
मुख्यमंत्री यांचे सचिव.